सुधारीत वेतनश्रेणीस अनुसरुन आस्थापना
मंडळाच्या कार्यकक्षेतील पदे ठरविण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक : ईएसबी-१०९९/प्र.क्र.२९/९९/१३,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : २० एप्रिल,१९९९.

पहा : १) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : ईएसबी-१०८४/३७६/ प्र.क्र.३८-८५/१३, दिनांक १९ मे,१९८७.

२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : ईएसबी-१०८९/प्र.क्र.६-८९/ १३, दिनांक ३ फेब्रुवारी ,१९८९.

३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : ईएसबी-१०८९/प्र.क्र.३७/८९/ १३, दिनांक २५ एप्रिल,१९८९.

४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : ईएसबी-१०८९/प्र.क्र.३७/८९/ १३, दिनांक ११ डिसेंबर,१९८९.

**निर्णय** :-

उपरोक्त दिनांक ३ फेब्रुवारी,१९८९ च्या शासन निर्णयाच्या परिच्छेद एक अन्वये शासन सेवेतील ज्या पदांच्या वेतनश्रेणींचा किमान टप्पा रु.३७०० किंवा त्यापेक्षा जास्त आहे अशा सर्व पदांवरील पदोन्नत्यांसाठी अधिकाऱ्यांची निवड करण्याची बाब आस्थापना मंडळाच्या कार्यकक्षेत येईल असे आदेश निर्गमित करण्यात आले होते.

२. शासन अधिसूचना, वित्त विभाग, क्रमांक : वेपूर-१२९८/प्र.क्र.१३/९८/सेवा-१०, दिनांक १०/१२/९८ अन्वये शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना सुधारित वेतनश्रेणी आता लागू करण्यात आल्या आहेत. सदर सुधारित वेतनश्रेणी विचारात घेऊन आस्थापना मंडळाच्या कार्यकक्षेतील पदे ठरविणेबाबतचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. शासनाने याबाबत आता असा निर्णय घेतला आहे की, ज्या पदांच्या वेतनश्रेणींचा किमान (सुधारीत) टप्पा रु.१२,०००/- ते १६,०००/- या वेतनश्रेणीमधील आहे अशा सर्व पदांवरील पदोन्नत्यांसाठी अधिकाऱ्यांची निवड करण्याची कार्यवाही आस्थापना मंडळ क्र. २ च्या कार्यकक्षेत येईल.

तसेच ज्या पदांच्या सुधारित वेतनश्रेणींचा किमान टप्पा रु.१६,४००/- किंवा त्यापेक्षा जास्त आहे अशा राज्य शासन सेवेतील सर्व पदावरील पदोन्नत्यांसाठी अधिकाऱ्यांची निवड करण्याची कार्यवाही आस्थापना मंडळ क्र.१ च्या कार्यकक्षेत येईल.

३. तरी मंत्रालयाच्या सर्व प्रशासकीय विभागांनी आस्थापना मंडळाच्या विचारार्थ पाठवावयाचे प्रस्ताव पदोन्नतीने भरावयाचे पद रिक्त होण्याच्या किमान ३ महिने अगोदर संदर्भाधीन, दिनांक १९ मे,१९८७ च्या परिपत्रकात नमूद केलेल्या कार्यपध्दतीनुसार प्रधान सचिव (सेवा)/सामान्य प्रशासन विभाग यांच्याकडे स्वतंत्र गोपनीय पत्राद्वारे पाठवावेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सही/-
( य.मा.जोशी )
उप सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने),
सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना कक्ष --सर्व आस्थापना कक्षांनी सदर आदेश त्या त्या विभागाच्या प्रशासकीय कार्यालयांच्या निदर्शनास आणून द्यावे.)
सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन क्र.८, ११-अ, १२-अ, १३-अ, १४, १५, १६-ब, १९, २०-अ, २०-ब, २१, २८, २८-अ, ३१, ३४-अ, ३७, ३८, मंत्रालय उपहारगृह कार्यालय, निवास व्यवस्था नियंत्रक, विज्ञान व तंत्रज्ञान कक्ष).